जलयुक्त शिवार अभियान, लेखाशिर्ष ४४०२
२७८१ अंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जशिअ- २०२३/प्र.क्र.२३०/जल-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ मार्च, २०२४

वाचा :-

१. शासन निर्णय, जलसंधारण विभाग, क्रमांक: जलअ-२०१४/प्र.क्र.२०३/जल-७, दि.५ डिसेंबर, २०१४
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि.१७ एप्रिल, २०१५

प्रस्तावना: -

सर्वासाठी पाणी टंचाईमुक्त महाराष्ट्र-२०१९ अंतर्गत शासन निर्णय ५ डिसेंबर, २०१४ अन्वये राज्यात जलयुक्त शिवार अभियान सन २०१५-१६ ते सन २०१८-१९ या कालावधीमध्ये राबविण्यात आले आहे. सदर अभियान दि.३१ मार्च, २०२० रोजी संपुष्टात आले आहे. सदर अभियानांतर्गत झालेल्या कामांची प्रलंबित देयके अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

जलयुक्त शिवार योजनेसाठी मागणी क्रमांक झेडएच-५, (०२) जलयुक्त शिवार (०२) (०१) जलयुक्त शिवार अभियान (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे, (४४०२ २७८१ ) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षाकरिता रु.४३६००००.०० हजार (सुधारित तरतूद) एवढी तरतूद आहे. सदर तरतूदीमधून जलयुक्त शिवार अभियान अंतर्गत पूर्ण झालेल्या कामांची प्रलंबित देयके अदा करण्याच्या अनुषंगाने संबंधित जिल्ह्यांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** प्रमाणे **रु.४८.१७०१ लक्ष (अक्षरी रूपये आठ्ठेचाळीस लक्ष सतरा हजार दहा फक्त)** निधी परिशिष्ट-अ मध्ये नमूद जिल्हाधिकारी यांना वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करण्यात येत असून, वितरीत करण्यात येत असलेला निधी, मंजूर तरतुदीतून खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.-

३.१ उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी जिल्हाधिकारी यांनी कार्यान्वयीन / संबंधित यंत्रणांना अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण (BEAMS) प्रणालीवर (आहरीत करून वर्ग न करता) उपलब्ध करून द्यावा.

३.२ वितरीत करण्यात येत असलेला निधी जलयुक्त शिवार अभियान अंतर्गत झालेल्या कामांसाठीच वितरीत करण्यात यावा.

३.३ निधी वितरीत करताना संबंधित कामांबाबत तक्रार नसल्याची खातरजमा करावी.

३.४ उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी तात्काळ खर्च करण्याबाबतची कार्यवाही करावी.

३.५ जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जलयुक्त शिवार अभियान, जिल्हास्तरीय कार्यकारी समिती यांनी खर्च ताळमेळ व इतर वित्तीय बाबींच्या समन्वयाची जबाबदारी पार पाडण्याच्या दृष्टीने आवश्यक उपाय योजना कराव्यात.

३.६ उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून झालेल्या खर्चाचे विवरणपत्र/ उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३.७ जलयुक्त शिवार योजनेंतर्गत झालेल्या कामांच्या देयकांची छाननी व देयके तपासण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाची राहील.

३.८ सदर निधी वितरण करताना काही अनियमितता झाल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील.

३.९ सदरचा निधी संबंधित यंत्रणेस वितरीत करण्यापूर्वी, सदर दाव्यांची तपासणी व पडताळणी करण्यात आली आहे आणि हे दावे पूर्वी कधीही काढण्यात आले नव्हते, कोषागारात सादर करण्यात आले नव्हते व त्यांचे प्रदान करण्यात आले नव्हते याबाबत खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

३.१० मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम ३९ आणि महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम १५१ अनुसार लागू असलेल्या तरतुदीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर निधी मागणी क्रमांक झेडएच-५, (०२) जलयुक्त शिवार (०२) (०१) जलयुक्त शिवार अभियान (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे, (४४०२ २७८१ ) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१२ एप्रिल, २०२३, दि. ०८ डिसेंबर, २०२३, व दि.०४ मार्च, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ नुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-दोन मधील

अ.क्र.६ समोरील नियम क्र.४० मधिल अ.क्र.१ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत असून, वित्त विभागाच्या उपरोक्त सर्व परिपत्रक व शासन निर्णयामधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१८१६१४४२३५२६ असा आहे. हा आदेश डिटीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DEVENDRA PANDIT BHAMARE
Date: 2024.03.18 16:44:56 +05'30'

**( देवेंद्र भामरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.सभापती, विधान परिषद यांचे सचिव.
३. मा.अध्यक्ष, विधान सभा यांचे सचिव.
४. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
५. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) व (गृह) यांचे सचिव.
६. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
७. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद व विधानसभा, विधान भवन, मुंबई.
८. सर्व मा.विधान परिषद / विधान सभा सदस्य, विधान भवन, मुंबई.
९. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य १ व २, मुंबई व नागपूर.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य १ व २, मुंबई व नागपूर.
१३. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. जिल्हाधिकारी, वाशिम, वर्धा, सांगली व ठाणे.
१५. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, कृषि आयुक्तालय, पुणे.
१६. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर.
१७. संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे.
१८. अप्पर आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, प्रादेशिक क्षेत्र, पुणे, नागपूर.
१९. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
२०. सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग.
२१. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.

२२. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
२४. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, वाशिम, वर्धा, सांगली व ठाणे.
२५. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग़, वाशिम, वर्धा, सांगली व ठाणे.
२६. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम, वर्धा, सांगली व ठाणे.
२७. निवडनस्ती जल-७

**शासन निर्णय क्रमांक जशिअ-२०२३/प्र.क्र.२३०/जल-७, दि.  मार्च, २०२४ सोबतचे**

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र | जिल्हा | वितरीत करण्यात येत असलेली रक्कम (रू.हजारात) |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी, वाशिम | **६४३.००** |
| २. | जिल्हाधिकारी, वर्धा | **२९.७६** |
| ३. | जिल्हाधिकारी, सांगली | **१०४६.००** |
| ४. | उपजिल्हाधिकारी, ठाणे | **३०९८.२५** |
| एकूण | | **४८१७.०१** |